**ग्रामीण भागातील यात्रास्थळांच्या विकासासाठी विशेष कार्यक्रम (२५१५ २५६६) ब वर्ग दर्जा प्राप्त तीर्थक्षेत्रांतर्गत पूर्ण झालेल्या कामांचा निधी वितरीत करणेबाबत.**
**(जिल्हा परिषद, बीड)**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः तीर्थवि-२०२५/ई-१०५२३५९/योजना-११**
बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ
फोर्ट, मुंबई ४०० ००१
**दिनांक: २८ मार्च, २०२५**

वाचा:-

१) ग्रामविकास विभाग,शासन निर्णय क्र.तीर्थवि-२०२४/ प्र.क्र.११३/ यो-११ दि.०४.०९.२०२४.
२) जिल्हा परिषद, बीड,बांधकाम विभाग यांचे जा. क्र. बांविक्र.१/बजेट कवि/४४१५/२०२४ दि.१२.१२.२०२४ रोजीचे पत्र.

प्रस्तावना:-

ग्रामीण भागातील यात्रास्थळांच्या विकासासाठी विशेष कार्यक्रम (२५१५ २५६६) योजनेंतर्गत उपरोक्त शासन निर्णय क्र.०१ अन्वये बीड जिल्ह्यातील “श्री. अश्वलिंग महादेव मंदिर, पिंपळवंडी, ता. पाटोदा, जि. बीड” या ब-वर्ग तीर्थक्षेत्राच्या ठिकाणी करण्यात येणाऱ्या विकास कामांना रु.४१०.०० लक्षची प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. संदर्भ क्र.२ अन्वये प्राप्त पत्रानुसार पूर्ण झालेल्या कामांचा उर्वरित निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

ग्रामीण भागातील यात्रास्थळांच्या विकासासाठी विशेष कार्यक्रम (२५१५ २५६६) ३१ सहायक अनुदान या योजनेंतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात एकूण **रु.४५०००.०० लक्ष** इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. सदर अर्थसंकल्पीत निधीतून जिल्हा परिषद, बीड यांच्याकडून संदर्भ क्र.२ च्या पत्रानुसार नमूद केलेल्या तीर्थक्षेत्राच्या प्राप्त देयकासाठी रु. ३२८.०० लक्ष (रुपये तीन कोटी अठ्ठावीस लक्ष फक्त ) इतका निधी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड यांना वितरीत करण्यात येत आहे. देयकांचे विवरणपत्र खालील प्रमाणे आहे.

| **अ. क्र** | **तीर्थक्षेत्राचे नाव** | **प्रशासकीय मान्यता शासन निर्णय क्रमांक व दिनांक** | **कामाचे नाव** | **प्रशासकीय मान्यतेची रक्कम (रू.लाखात)** | **मागणी प्रमाणे वितरित करावयाची रक्कम (रू. लाखात)** |
|---|---|---|---|---|---|
| १ | श्री. अश्वलिंग महादेव मंदिर, पिंपळवंडी, ता. पाटोदा, जि. बीड. | तीर्थवि-२०२४/ प्र.क्र.११३/ यो-११ दि.०४.०९.२०२४ | १.प्रसादालय | ८२.०० | ६५.६० |
| | | | २. भक्तनिवास | ५०.०० | ४०.०० |
| | | | ३. संरक्षण भित | ४५.०० | ३६.०० |
| | | | ४. पेव्हिंग ब्लॉक | ८०.०० | ६४.०० |
| | | | ५. पोहोच रस्ता | ९०.०० | ७२.०० |
| | | | ६. सुशोभीकरण (लेव्हलिंग पथ दिवे) | ६३.०० | ५०.४० |
| | | **एकूण** | | **४१०.००** | **३२८.००** |

२. जिल्हा परिषद, बीड यांनी सदर निधी खर्च करताना संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयात नमूद केलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे.

३. सदर खर्च मागणी क्र.एल-०३ "२५१५ इतर ग्रामविकास कार्यक्रम-१९६-जिल्हापरिषद/जिल्हास्तरीय पंचायतींना सहाय्य (००) (०८) ग्रामीण भागातील यात्रास्थळांच्या विकासासाठी विशेष कार्यक्रम (२५१५ २५६६) ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा व त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. वरीलप्रमाणे ज्या कामाच्या प्रयोजनासाठी निधी उपलब्ध करून दिलेला आहे, तो त्याच कामावर तात्काळ खर्च करून, सदर सहायक अनुदानाच्या विनियोजनासंबधीचे उपयोगिता प्रमाणपत्रे, महालेखापाल कार्यालय, मुंबई व या विभागास पाठविण्यात यावी. तसेच वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र: अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३,दि.२५ जुलै,२०२४ मधील अटीची व शर्तीचे पालन करण्यात यावे.

५. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या मान्यतेने, वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र. ३२/२०२५/व्यय-१५, दि.२०.०१.२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२८१२३८२६१४२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

KALU GONYA VALVI

Digitally signed by KALU GONYA VALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=714701fc3db9c38a46f4cd82e1e450b51a9e92eede8c323934f82edb538d3b20, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8C5D0F275C3D9A21DB07FECF7919C2D83796E88930D62D44E7A4A6D4CBEE7E0E, cn=KALU GONYA VALVI
Date: 2025.03.28 15:48:27 +05'30'

**( का.गो. वळवी )**
**सह सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य मलबार हिल, मुंबई.
२) मा. मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव.
३) मा. राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.
५) महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.
६) विभागीय आयुक्त, आयुक्त कार्यालय, छत्रपती संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर.
७) जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, बीड.
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड.
९) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, बीड.
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, बीड.
११) नियोजन विभाग, (का-१४४४) मंत्रालय, मुंबई-३२.
१२) वित्त विभाग (व्यय १५, अर्थसं १६, अर्थसं १७) मंत्रालय,मुंबई ३२.
१३) कार्यासन क्र.वित्त-७, वित्त-१, वित्त-८, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) निवड नस्ती (का.यो-११), ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.